राजर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना या योजनेकरिता निधी आंहरित व वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: तंशिपू-३३१९/(प्र.क्र.१६७/१९)/तांशि-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक: १३ फेब्रुवारी, २०२०.**

**वाचा: -**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१५ एप्रिल, २०१७.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.२१ जून, २०१७.
४) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि.७ ऑक्टोबर, २०१७.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०१९.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र३-अर्थ/११५.क्र.प्र/२०१९-पूरक., दिजानेवारी ०३., २०२०
८) संचालक, तंत्रशिक्षण यांचे क्र.१८/अर्थसं/ईबीसी/खप्रमा/२०१९-२०/१०, दि.१० जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना:-**

आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांतील विद्यार्थी केवळ निधी अभावी व्यावसायिक अभ्यासक्रमांपासून वंचित राहू नयेत म्हणून एक सामाजिक बांधिलकी व घटनात्मक उत्तरदायित्व म्हणून राज्य शासनाने सदर विद्यार्थ्यांची शुल्क प्रतिपूर्ती करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शैक्षणिक वर्ष २००६-०७ मध्ये घेतलेला आहे. संदर्भ क्र.१ येथील दि.१३ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयानुसार काही बदलांसह योजना सुधारित स्वरुपात सन २०१६-१७ पासून लागू करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र.४ येथील दि.७ ऑक्टोबर, २०१७ अन्वये राजर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेंतर्गत आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील पात्र विद्यार्थ्यांसाठी लाभाची व्याप्ती वाढविणे व नवीन अभ्यासक्रमांचा समावेश करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

"राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" या योजनेसाठी वार्षिक योजना २०१९-२०२० मध्ये मूळ अर्थसंकल्पात रु.५२८.३८ कोटी तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या सूचनेनुसार सदर मंजूर तरतूदीच्या ६०% प्रमाणे रु.३१७.०२ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. त्यापैकी सन २०१८-१९ च्या प्रलंबित शिष्यवृत्तीच्या थकबाकीकरीता रु.६९.४३ कोटी व सन २०१९-२० मध्ये पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांकरीता रु.२३६.७५ कोटी असा एकूण रु.३०६.१८ कोटी इतका निधी खर्च झाला आहे. सदर योजनेसाठी विधीमंडळाच्या डिसेंबर-२०१९

च्या हिवाळी अधिवेशनात रु.८०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित झाला आहे. संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.१० जानेवारी, २०२० च्या पत्रान्वये रु.८०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यासाठी प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन सदर योजनेकरीता विधीमंडळाच्या डिसेंबर-२०१९ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर झालेला रु.८०.०० कोटी इतक्या निधीच्या ८० टक्केच्या मर्यादेत रु.६४.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन** :

"राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२० मध्ये पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती अदा करण्याकरीता खाली नमूद केल्याप्रमाणे अर्थसंकल्पित रु.६४.०० कोटी (अक्षरी रुपये चौसष्ट कोटी फक्त) इतकी रक्कम संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांना "खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून" आंहरित व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रु.कोटीत)

| मार्च- २०१९ मध्ये मंजूर निधी | ६०% प्रमाणे वितरीत केलेला निधी | झालेला खर्च | डिसें.-२०१९ मध्ये मंजूर निधी | वितरीत करावयाचा निधी (८० टक्के) |
|---|---|---|---|---|
| ५२८.३८ | ३१७.०२ | ३०६.१८ | ८०.०० | ६४.०० |

**अटी :-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६, क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१५ एप्रिल, २०१७ व क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि -४, दि.७ ऑक्टोबर, २०१७ तसेच या संदर्भातील इतर आदेशामध्ये नमूद अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२) केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेतील पात्र प्रवेशित विद्यार्थ्यांनाच शैक्षणिक शुल्क शिष्यवृत्तीचा लाभ देण्यात यावा. ही रक्कम पात्र विद्यार्थ्यांच्या महाडिबीटी पोर्टलच्या माध्यमातून बँक खात्यात थेट जमा होईल या दृष्टिने कार्यवाही करावी.

३) संचालक, तंत्रशिक्षण व सर्व विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील नमुन्यादाखल काही संस्थाना भेट देऊन या योजनेची अंमलबजावणी व्यवस्थितरीत्या होत असल्याची वेळोवेळी तपासणी करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४) यापूर्वीच्या तपासणी अहवालात काही त्रुटी/अनियमितता आढळून आली असल्यास ती तात्काळ दूर करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना संचालक, तंत्रशिक्षण यांनी करावी. चूकीची अथवा खोटी माहिती भरुन शासनाकडून शिक्षण शुल्क प्राप्त करुन घेतले असल्याचे निदर्शनास आले असल्यास अशी रक्कम वसूल करुन ती शासनाकडे जमा करण्यात यावी. तसेच यामध्ये संस्था दोषी आढळल्यास सदर संस्थेच्या अभ्यासक्रमाची मान्यता काढून घेण्यासाठी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेकडे अथवा अन्य सक्षम प्राधिकरणाकडे शिफारस करणे/फसवणूकीचा गुन्हा दाखल करणे या व अशा स्वरुपाची कडक कार्यवाही करण्यात यावी.

५) या शासन ज्ञापनाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत निधीचे वाटप करावे व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. निधीचे वाटप करण्यास विलंब करु नये. याबाबतची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण यांची राहील.

३. उपरोक्त योजनेखाली करण्यात येणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "२२०३-तंत्रशिक्षण, मागणी क्र.डब्ल्यू-३, तंत्रशिक्षण १०७, शिष्यवृत्ती (००) (००)(०६) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना, (कार्यक्रम) (२२०३ ०७४८) ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. संदर्भाधीन दि.२१ जून, २०१७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१० नुसार सदर योजनेचा प्रशासकीय खर्च भागविण्याकरीता तंत्रशिक्षण संचालनालयास प्रतिवर्षी विद्यार्थ्यांना अदा करण्यात येणाऱ्या एकूण खर्चाच्या ०.५ टक्के इतका निधी अनुज्ञेय राहील.

५. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८/१४७१, दि.२१ जानेवारी, २०२० अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८७/२०२०/व्यय-५, दि.२८ जानेवारी, २०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेतांक २०२००२१३१६०२३५७४०८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a393e9553ec410a2133a89ca969ca76abd4ca892102ef711a7ff f2d0c54599c7, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c63b0a0419f0eb37099daca08e4cccce3bf49154bf43e88 81e68ac2ca3a46392, ou=HIGHER AND TECH, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2020.02.14 12:53:48 +05'30'

**(मनाली मि.सामंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सर्व विभागीय तंत्रशिक्षण सह-संचालक. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव/तांशि-४, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती/तांशि-३.